मराठवाडा विभागासाठी १००% राज्य पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुसिंयो-२११६/प्र.क्र.३९८/१६/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०६ मार्च, २०१७

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांक प्रकृसिं-२११६/प्र.क्र.१४०/४अे, दि. १२ ऑगस्ट, २०१६
२. शासन निर्णय क्रमांक सुसिंयो-२११५/प्र.क्र.३८२/४अे, दि. १४ ऑक्टोबर, २०१६.
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. - अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८ फेब्रुवारी, २०१७

प्रस्तावना-

मराठवाडा विभागात सतत पडणाऱ्या दुष्काळाच्या पार्श्वभूमीवर उपलब्ध पाण्यामध्ये जास्तीत जास्त क्षेत्र सुक्ष्म सिंचनाखाली आणण्याच्या उद्देशाने, संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, मराठवाडा विभागासाठी १००% राज्य पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना ३ वर्षाच्या कालावधीसाठी राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयानुसार ३ वर्षाच्या कालावधीत सुमारे ३३७ कोटी एवढया रकमेचा कार्यक्रम राबवावयाचा आहे. त्यापैंकी रु.५० कोटी एवढया रकमेचा कार्यक्रम सन २०१६-१७ या वर्षात व उर्वरित रु.२८७कोटी एवढया रकमेचा कार्यक्रम त्यापुढील दोन वर्षात, प्रति वर्षी रु.१४३.५० कोटी याप्रमाणे राबवावयाचा आहे. सदर योजनेची सन २०१६-१७ या वर्षात अंमलबजावणी करण्यासाठी, डिसेंबर-२०१६ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे निधी रु.२० कोटी एवढा निधी मंजूर झाला आहे. वित्त विभागाने संदर्भाधीन अ.क्र. ३ येथील परिपत्रकान्वये पुरवणी मागण्याद्वारे मंजूर झालेल्या अनुदानापैकी, ३३-अर्थसहाय्य लेखाशिर्षाखालील १००% अनुदान वितरीत करण्याचे अधिकार विभागास प्रदान केले आहेत. त्यानुसार डिसेंबर - २०१६ च्या अधिवेशनात मंजूर झालेला निधी रु.२०.०० कोटी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

१. मराठवाडा विभागासाठी सन २०१६-१७ या वर्षात १००% राज्य पुरस्कृत सूक्ष्म सिंचन योजना राबविण्यासाठी रु.२० कोटी एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर खर्च सन २०१६-१७ या वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-३
२४०१, पीक संवर्धन
(००) ११९, बागायाती व भाजीपाला पिके
(०३) रोपमळे
(०३) **(३५)** १००%राज्य पुरस्कृत सूक्ष्म सिचंन योजना (केद्र पुरस्कृत सूक्ष्म सिचंन अभियानासी समांतर)
(२४०१९४४७)
३३ - अर्थसहाय्य

३. सदर निधीचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

४. सदर निधी प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत सन २०१६-१७ या वर्षात प्राप्त अर्जांसाठी निधीच्या मर्यादेत पूर्वसंमती देऊन वापरण्यात यावा.

५. सदर निधीतून मराठवाडा विभागातील शेतकऱ्यांना २ हेक्टर क्षेत्राच्या मर्यादेत अनुदान देण्यात यावे.

६. योजनेची अंमलबजावणी करताना परिच्छेद क्र. ५ मध्ये नमूद क्षेत्र मर्यादेची अट वगळता, उर्वरित बाबतीत केंद्र शासनाच्या शेतावरील पाणी व्यवस्थापन उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना तसेच संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दि. १२ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परीपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८ फेब्रुवारी, २०१७ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६१६४२३३९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.03.06 16:45:00 +05'30'

**( सु.सं.धपाटे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
२) मा.मंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव

३) मा.राज्यमंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव (कृषी) यांचे स्वियं सहायक
५) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
६) विभाग प्रमुख, एकात्मिक जल व्यवस्थापन, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
७) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
८) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापिठ, परभणी
९) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापिठ, दापोली
१०) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठ, अकोला
११) विभागीय कृषी सहसंचालक (औरंगाबाद व लातुर)
१२) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली)
१३) मंडळ कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी (मराठवाडा विभागातील)
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली)
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१७) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
१९) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/नागपुर
२०) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२१) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२२) निवडनस्ती.